नदी खोऱ्यांच्या क्षेत्रामध्ये उद्योगधंद्यांचे पर्यावरण विषयक स्थान नियमन धोरण.......

**महाराष्ट्र शासन**

पर्यावरण विभाग, मंत्रालय,

शासन निर्णय, क्रमांक: मंमंबै-२०००/३२६/प्र.क्र.२२/तां.क.३

नविन प्रशासन भवन, १५वा मजला, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: **१५ जुलै, २०००**

**प्रस्तावना :-** नदी काठावरील कारखाने सांडपाण्यावर अपूरी प्रक्रिया करुन किंवा प्रक्रिया न करता सांडपाणी नदीत सोडतात, यामुळे नदीचे प्रदुषण होत असते. उद्योग स्थापन करण्याबाबत नक्की असे धोरण सध्या नाही म्हणून नदीच्या काठावर येणारे उद्योग हे त्यांच्या प्रदुषण क्षमतेनुसार नदीपासून जवळ किंवा लांब अंतरावर स्थापन करण्याच्या दृष्टीने राज्य शासनाने धोरण तयार केलेले आहे.

शासन निर्णय:-महाराष्ट्रातील २० नद्यांच्या खोऱ्यांच्या क्षेत्राचे नदीच्या पाण्याच्या गुणवत्तेनुसार अ-१, अ-२, अ-३, अ-४ या चार वर्गामध्ये वर्गीकरण करण्यांत आलेले आहे. वीस नद्यांच्या खोऱ्यांच्या पाण्याच्या गुणवत्तेनुसार वर्गीकरण करताना नद्यांच्या खोऱ्यांची नांवे व वर्गीकरणासाठी विहित केलेली पाण्याची गुणवत्ता सोबत अनुक्रमे परिशिष्ट १ व परिशिष्ट २ प्रमाणे आहे. त्यानुसार नदीच्या उगमापासून पहिल्या धरणापर्यन्त अ-१, पहिल्या धरणापासून अ-२ भागासाठी विहित केलेली पाण्याची गुणवत्ता अ-२ वर्गीकरणामध्ये, अ-३ वर्गीकरणामध्ये पाणी मत्स्य संवर्धनासाठी व वन्य पशुंसाठी योग्य असणे आवश्यक आहे व अ-४ वर्गीकरणामध्ये नदीचे पाणी शेतीसाठी तसेच औद्योगिक वापरासाठी योग्य गुणवत्तेचे असणे अपेक्षित आहे.

उद्योगधंद्यांच्या स्थापनेला वरील प्रमाणे चार वर्गीकरण क्षेत्रामध्ये उद्योगांच्या स्थान निश्चयन करण्याच्या दृष्टीकोनातून खालील प्रमाणे नियमन करण्यांत आलेले आहे.

१ अ-१ या वर्गामध्ये नदीच्या उच्चतम पूररेषेपासून दोन्ही बाजूस तीन किलोमीटरपर्यंतच्या क्षेत्रात उद्योग उभारण्यासाठी प्रतिबंध राहिल. त्यानंतरच्या पाच किलोमीटर पर्यंतच्या क्षेत्रात हिरव्या व नारींगी संवर्गातील उद्योग उभारणे अनुज्ञेय राहिल. त्यापुढील म्हणजेच आठ किलोमीटर नंतरच्या क्षेत्रात कोणत्याही कारखान्यांना योग्य ती प्रदूषण नियत्रण यंत्रणा बसविल्यानंतर परवानगी देता येईल.

२ अ-२ वर्गामध्ये नदीच्या उच्चतम पूररेषेपासून दोन्ही बाजूस एक किलोमीटर पर्यंतच्या क्षेत्रात उद्योग उभारण्यासाठी प्रतिबंध राहिल. त्यानंतरच्या एक किलोमीटर पर्यंतच्या क्षेत्रात हिरव्या व नारींगी संवर्गातील उद्योग उभारणे अनुज्ञेय राहिल. त्यापुढील म्हणजेच दोन किलोमिटर नंतरच्या क्षेत्रात कोणत्याही कारखान्यांना योग्य ती प्रदुषण नियंत्रण यंत्रणा बसविल्यानंतर परवानगी देता येईल.

३ अ-३ व अ-४ या दोन्ही वर्गांमध्ये नदीच्या उच्चतम पूररेषेपासून दोन्ही बाजूस अर्धा किलोमीटरपर्यंतच्या क्षेत्रात उद्योग उभारण्यासाठी प्रतिबंध राहिल. त्यानंतरच्या

अर्ध्या किलोमीटर पर्यंतच्या क्षेत्रात हिरव्या व नारिंगी संवर्गातील उद्योग उभारणे अनुज्ञेय राहिल. त्यापुढील म्हणजेच एक किलोमीटर नंतरच्या क्षेत्रात कोणत्याही कारखान्यांना योग्य ती प्रदुषण नियंत्रण यंत्रणा बसविल्यानंतर परवानगी देता येईल.

४ वर नमुद केलेल्या चारही वर्गीकृत क्षेत्रामध्ये पाणलोट क्षेत्राची कडा प्रस्तावित अंतरापेक्षा कमी अंतरावर असेल तर हे निर्बंध सदर पाणलोट क्षेत्राच्या कडेपर्यंत लागू राहतील.

५ अ-१, अ-२, अ-३, अ-४ वर्गीकरण केलेल्या क्षेत्रात सध्या अस्तित्वात असलेल्या उद्योगांपैकी काही उद्योग ना विकास क्षेत्रामध्ये असतील, तसेच काही लाल संवर्गातील उद्योग ना विकास क्षेत्रामध्ये किंवा हिरव्या व नारिंगी क्षेत्रातील उद्योगांसाठी अनुज्ञेय असलेल्या भागामध्ये अस्तित्वात असतील अशा उद्योगांच्या अस्तित्वाला कोणतीही बाधा येणार नाही. अशा उद्योगांना स्त्रोत प्रदुषणात घट होत असल्यास आधुनिकीकरण, विस्तारीकरण आणि / किंवा उत्पादनाची अदलाबदल करण्यास मंजूरी मिळू शकेल.

६ नवीन उद्योग स्थापण्यास बंदी घालण्यात आलेल्या क्षेत्रामध्ये प्रदुषणविरहीत बिगर औद्योगिक प्रकल्प / धंदा करण्यास प्रदुषण नियंत्रण मंडळाच्या परवानगीने अनुमती देण्यात यावी. याबाबत परिशिष्ट ३ मधील यादी ही मार्गदर्शक राहिल.

७ उद्योगांचे स्थान निश्चयन करण्याचे धोरण महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने स्थापन करावयाच्या औद्योगिक क्षेत्रासाठी सुध्दा लागू राहिल. तथापि सर्वसाधारण धोरणास अपवाद म्हणून, अस्तित्वात असलेल्या महाराष्ट्र औद्यागिक विकास महामंडळाच्या औद्यागिक क्षेत्रासाठी, ज्या ठिकाणी जमिन संपादीत करुन विकसित देखील झाली आहे पण प्लॉट वाटप व्हावयाचे बाकी आहे अशा प्रकरणी, अ-२ या वर्गीकृत क्षेत्रात नदीच्या उच्चतम पूररेषेपासून दोन्ही बाजूस ५०० मीटरपर्यंतच्या क्षेत्रात उद्योग उभारण्यासाठी प्रतिबंध राहिल.

८ भातसा जलग्रहण क्षेत्रासाठी उद्योग विभागाने शासन निर्णय क्रमांकः आयएलपी-१०८७/ २४७७/ उद्योग-२, दिनांक ४/१२/१९८७ अन्वये काढलेले आदेश पुढे चालू राहणार असल्यामुळे प्रस्तुत आदेश भातसा जलग्रहण क्षेत्रासाठी लागू होणार नाहीत.

९ उद्योगांची त्यांच्या प्रदुषण क्षमतेनुसार विशिष्ट रंगाने वर्गवारी करण्यांत आलेली आहे. (परिशिष्ट-४) त्यानुसार अतिप्रदुषणकारी उद्योंगांचे लाल, मध्यम प्रदुषणकारी उद्योगांचे नारींगी तर कमी प्रदुषण करणाऱ्या उद्योगांचे हिरव्या रंगामध्ये वर्गीकरण करण्यांत आलेले आहे. काही उद्योगांच्या वर्गीकरणाबाबत संदिग्धता असल्यास त्याबाबतचा निर्णय पर्यावरण विभागाने गठीत केलेल्या तज्ञ समितीच्या सल्ल्याने सोडविण्यांत यावा.

१० उद्योगांचे स्थान निश्चयन करताना नदीच्या उच्चतम पूर रेषेपासूनचे अंतर ठरविताना क्षीतीज समांतर सरळ रेषेत अंतर हे कार्यकारी अभियंता, पाटबंधारे विभाग, महाराष्ट्र शासन यांनी प्रमाणित करावे.

नदी खोऱ्यांच्या क्षेत्रामध्ये उद्योगधंद्यांचे पर्यावरण विषयक स्थान नियमन अंमलात आणण्याकरीता पर्यावरण (संरक्षण) अधिनियम, १९८६ च्या कलम ५ व पर्यावरण (संरक्षण) नियम, १९८६ च्या नियम ४(५) अन्वये असलेल्या अधिकारांचा वापर करुन हे आदेश जारी करण्यांत आलेले आहेत.

हे नियमन हा शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

डॉ. प्रमोद देव
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव.
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
मा.उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
मुख्यसचिव, महाराष्ट्र शासन.
सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्यसचिव / प्रधान सचिव / सचिव,
संचालक, पर्यावरण / पर्यावरण विभागातील सर्व अधिकारी.
मा.मंत्री, पर्यावरण व वने यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री, पर्यावरण व वने यांचे खाजगी सचिव.
सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य औद्योगिक विकास महामंडळ.
अध्यक्ष / सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
संचालक, उद्योग संचालनालय
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय
पर्यावरण विभागातील सर्व कार्यासने / निवड नस्ती.

GR-२००२०४१२१७१३४७०००-२२००